**औरंगाबाद महसूली विभागात नामसाधर्म्याचा फायदा घेऊन अनुसूचित जमातीची बोगस जात प्रमाणपत्रे, पडताळणी समितीचे बनावट वैधता प्रमाणपत्रे प्राप्त करणे इ. ची सखोल तपासणी करण्यासाठी गठीत केलेल्या “विशेष तपासणी समिती” ला मुदतवाढ देण्याबाबत-**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-२०१६/प्र.क्र.६१ /का.१०**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ३१ जानेवारी, २०१७

<u>वाचा -</u>

१) **शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः एसटीसी-२०१६/प्र.क्र.६१/का.१०, दिनांक १ जुलै, २०१६.**
२) **शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः एसटीसी-२०१६/प्र.क्र.६१ /का.१०, दिनांक १७ सप्टेंबर, २०१६.**
३) **आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः आसप्रस/प्र.क्र. २०/का.३/७२४, दिनांक ३१.१२.२०१६.**

<u>प्रस्तावना -</u>

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये औरंगाबाद महसूली विभागात नामसाधर्म्याचा फायदा घेऊन अनुसूचित जमातीची बोगस जात प्रमाणपत्रे, पडताळणी समितीचे बनावट वैधता प्रमाणपत्रे प्राप्त करणे इ. ची सखोल तपासणी करण्यासाठी विभागीय आयुक्त, औरंगाबाद महसूल विभाग, औरंगाबाद यांचे अध्यक्षतेखाली एक विशेष तपासणी समिती गठीत करण्यात आली आहे. तद्नंतर उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विशेष तपासणी समितीची फेररचना करण्यात आली आहे. सदर विशेष तपासणी समितीने स्थापनेपासून ६ महिन्यात अहवाल शासनास सादर करावयाचा होता. तथापि, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी दिनांक ३१.१२.२०१६ रोजीच्या प्रपत्रान्वये समितीला महसूली, शालेय दस्तऐवज प्राप्त करणे तसेच इतर प्रशासकीय विभागाकडून माहिती प्राप्त करुन अहवाल तयार करण्यास अधिक कालावधी लागणार असल्याने समितीस आणखी सहा महिन्यांची मुदतवाढ देण्याबाबत शासनास विनंती

केलेली आहे. त्याअनुषंगाने, सदर विशेष तपासणी समितीस अहवाल सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

औरंगाबाद महसूली विभागात नामसाधर्म्याचा फायदा घेऊन अनुसूचित जमातीची बोगस जात प्रमाणपत्रे, अवैध मार्गाने अनुसूचित जमातीची बनावट जात प्रमाणपत्रे व पडताळणी समितीचे बनावट आदेश, न्यायालयाचे बनावट निर्णय तयार करणे इ. ची सखोल तपासणीसाठी उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार गठीत केलेल्या व संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयानुसार फेररचना करण्यात आलेल्या "विशेष तपासणी समितीस" अहवाल शासनास सादर करण्यास दिनांक १.१.२०१७ पासून सहा महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३११७३००२६०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2017.01.31 17:34:46 +05'30'

( ल. गो. ढोके )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.विधीमंडळ सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, विधान भवन, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
११.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.सचिव (सा.वि.स.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५.विभागीय आयुक्त, औरंगाबाद महसूल विभाग, औरंगाबाद
१६.विशेष पोलीस महानिरीक्षक, परिक्षेत्र औरंगाबाद, औरंगाबाद
१७.विशेष पोलीस महानिरीक्षक, परिक्षेत्र नांदेड, नांदेड
१८.विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परीक्षेत्र, कोकण भवन, नवी मुंबई
१९.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२०.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२१.सर्व विभागीय आयुक्त
२२.सर्व विशेष पोलीस महानिरिक्षक
२३.सर्व पोलीस उपमहानिरिक्षक
२४.सर्व पोलीस आयुक्त
२५.सर्व जिल्हाधिकारी
२६.सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
२७.सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास
२८.सर्व सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती,
२९.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
३०.सर्व मंत्रालयीन विभाग,
३१.सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३२.निवड नस्ती